**पवित्र (PAVITRA- Portal For Visible To All Teacher Recruitment) या संगणकीय प्रणालीद्वारे राज्यातील सर्व व्यवस्थापनाच्या शाळांमधील शिक्षक निवडीसाठी पारदर्शक पध्दती विहित करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र. सीईटी-२०१५/प्र.क्र.१४९/टीएनटी-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २३ जून, २०१७.

वाचा :-

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.पीआरई २००८/(४७६७)/प्राशि-१, दिनांक ३० एप्रिल, २००८
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.पीआरई २००६/(४७६७)/प्राशि-१, दिनांक १६ डिसेंबर, २००९

प्रस्तावना:-

राज्यात सन २००३-२००४ या शैक्षणिक वर्षापासून सुधारीत प्राथमिक शिक्षण सेवक योजना कार्यान्वित करण्यात आली. तर सन २००८-२००९ पासून स्थानिक स्वराज्य संस्थेअंतर्गत प्राथमिक शाळेतील शिक्षण सेवक पदासाठी पात्र अभिव्यक्ती असलेल्या उच्च गुणवत्ताधारक उमेदवाराची निवड होण्याच्या दृष्टीने प्राथमिक शिक्षण सेवक पदासाठी भरतीपूर्व केंद्रिय निवड परीक्षा पध्दती लागू करण्यात आली. सद्यस्थितीत स्थानिक स्वराज्य संस्थाच्या प्राथमिक शाळेतील शिक्षकांची निवड केंद्रिय भरतीपूर्व निवड परीक्षेद्वारे ( C.E.T.) करण्यात येते. तर महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) विनियमन अधिनियम, १९७७ मधील तरतूदीनुसार खाजगी शाळांतील शिक्षकांची नियुक्ती वृत्तप्रत्रात जाहिरात देवून करण्यात येते. तथापि, शिक्षक निवड आणि नियुक्ती प्रक्रियेत मोठ्या प्रमाणावर अनियमितता होत असल्याच्या तक्रारी शासनास प्राप्त होतात. गुणवत्ताधारक उमेदवारांची निवड न झाल्यामुळे विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक गुणवत्तेवर परिणाम होण्याची शक्यता असल्याची बाब निदर्शनास आली आहे.

मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथील जनहित याचिका क्रमांक ८/२०१५ च्या अनुषंगाने दिनांक २४ जुन, २०१५ रोजी झालेल्या सुनावणीच्यावेळी मा. न्यायालयाने पुढीलप्रमाणे निरिक्षण नोंदविले आहे :-

The Perusal of the petition would reveal that a large issue regarding selection of teaching and non-teaching staff in private schools run by private management on grant and no-grant basis has been raised in the present petition.

Undisputedly the schools on grant-in-aid basis receive grant for the entire salary from the public exchequer. Even in spite of that the recruitment in such schools is by the private management. It is a common knowledge that the factors while making selection and recruitment by such a private management at times are other than the merit.

By now it is the settled principle of law that a back door entry in public employment is not permissible. If the salaries of the staff in the private management are paid from the public exchequer, there is no reason as to why the employment in such management should not be only on the criteria of merit. We are well aware about our limitation that we cannot issue a direction to the State to frame a particular policy. However, the State in order to bring about the fairness in the selection process of the staff whose salary is paid from the public exchequer, is expected to frame such a policy, which would ensure that the selection is only on the basis of the merit and it should be ensured that the malpractices are avoided.

We expect the State to consider the petition from that angle.

खाजगी अनुदानित शाळेतील शिक्षक भरती गैरव्यवहार टाळण्यासाठी व गुणवत्तेवर आधारित निवड होऊन निवडप्रक्रियेत पारदर्शकता येण्यासाठी राज्य शासनाने उपाययोजना करण्याबाबत मा. उच्च न्यायालयाने निर्देश दिलेले आहेत. मा. सर्वोच्च न्यायालयात **T.M.A. Pai Foundation and Others Verses State of Karnataka Govt.** यामध्ये निर्णय देताना खाजगी शाळांमधील निवडप्रक्रियेमध्ये राज्य शासनास हस्तक्षेप करता येणार नाही, असे निर्देश मा. न्यायालयाने दिलेले आहे. याबाबत दोन्ही मा. न्यायालयाचे आदेश विचारात घेवून, त्यानुसार कार्यवाही करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

स्थानिक स्वराज्य संस्थांतर्गत प्राथमिक शाळांमधील शिक्षण सेवक भरती प्रक्रिया यापूर्वी केंद्रीय भरतीपूर्व निवड परीक्षेच्या माध्यमातून करण्यात येत होती. सदर परीक्षा प्रक्रिया रद्द करुन स्थानिक स्वराज्य संस्थांसह खाजगी शैक्षणिक संस्थांतर्गत असलेल्या प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षण सेवक भरती प्रक्रिया अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणी परीक्षेची वैशिष्ट्ये विचारात घेवून त्यामधील गुणांच्या आधारे करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर अभियोग्यता चाचणी परीक्षेची वैशिष्ट्ये खालीलप्रमाणे:-

१) अभियोग्यता चाचणी व शिक्षण सेवक निवड प्रक्रिया संगणकीय प्रणालीच्या आधारे करण्यात येणार असल्याने मानवी हस्तक्षेपास वाव राहणार नाही.

२) या कार्यपध्दतीत संबंधीत स्थानिक "स्वराज्य संस्था व खाजगी शैक्षणिक संस्था" (यापुढे "संस्था" असे वाचावे) यांना त्यांच्या शाळांमधील शिक्षकांची रिक्त पदे भरताना

आरक्षण विषयक बाबी विचारात घेवून पदांची जाहिरात, शासनातर्फे प्रसिध्द करण्यात येणाऱ्या संगणकीय प्रणालीवर किमान कालावधीकरीता प्रसिध्द करावे लागेल.

३) अभियोग्यता चाचणीच्या माध्यमातून उमेदवारास त्याच्या गुणांमध्ये वाढ करण्याची संधी त्याच्या सेवाप्रवेश वयोमर्यादेत ५ वेळा उपलब्ध होईल.

४) अभियोग्यता चाचणी परीक्षा दिलेल्या उमेदवारांची गुणवत्ता यादी प्रसिध्द करण्यात येणार नाही. सदर चाचणी परीक्षा दिलेल्या राज्यातील कोणत्याही उमेदवारास, शासनाच्या संगणकीय प्रणालीमध्ये प्रसिध्द केलेल्या स्थानिक स्वराज्य संस्था/खाजगी शैक्षणिक संस्थेच्या जाहिरातीस अनुसरुन अर्ज करता येईल.

५) संस्थेच्या जाहिरातीस प्रतिसाद दिलेल्या उमेदवारांची, अभियोग्यता चाचणीतील गुणांच्या आधारे ज्या विषयासाठी शिक्षण सेवक म्हणून अर्हता प्राप्त उमेदवाराची नियुक्ती करावयाची आहे, त्या विषय-निहाय गुणवत्ता यादीतील अग्रक्रमानुसार शिक्षण सेवक म्हणून निवड सदर संस्थेस करावी लागेल.

६) शिक्षक भरती गुणवत्तेच्या आधारे पारदर्शक पध्दतीने व विहीत कालमर्यादेत होईल.

७) शिक्षक भरती प्रक्रीयेमध्ये राज्य शासनाचा अथवा खाजगी संस्थेचा हस्तक्षेप राहणार नाही.

८) मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालय यांनी शिक्षक भरती प्रक्रियेबाबत दिलेल्या न्याय निर्णयाची अंमलबजावणी करता येणार आहे.

वरील सर्व बाबींचा विचार करुन राज्यातील सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांसह खाजगी व्यवस्थापनाच्या शाळातील प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षकांची रिक्त पदे अभियोग्यता चाचणी परीक्षेतील गुणांच्या आधारे भरण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांसह खाजगी व्यवस्थानाच्या अनुदानित, अंशत: अनुदानित व अनुदानास पात्र घोषित केलेल्या प्राथमिक,उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षण सेवकांच्या रिक्त पदावर भरती करताना सर्व उमेदवारांना निवडीची समान संधी मिळावी व शिक्षण सेवक पदासाठी उच्च गुणवत्ताधारक उमेदवाराची निवड होण्याच्या दृष्टीने शिक्षण सेवकाची भरती "**अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणी**" यामध्ये मिळालेल्या गुणांच्या आधारावर यापुढे करण्यात येईल.

अ) यापुढील काळात शाळांमधील शिक्षण सेवक भरती अभियोग्यता चाचणीच्या माध्यमातून केली नसल्यास अथवा करण्यात न आल्यास, अशा संबंधित शैक्षणिक संस्थांना/शाळांना कोणत्याही परिस्थितीत अनुदान अनुज्ञेय होणार नाही/राहणार नाही.

आ) तथापि, स्वयंअर्थसहायित शाळा व अल्पसंख्यांक संस्था संचलित शाळांमधील शिक्षण सेवक भरतीस अभियोग्यता चाचणी प्रक्रिया लागू राहणार नाही. या प्रयोजनासाठी इंग्रजी माध्यमाच्या शाळा स्वयंअर्थसहायित शाळा म्हणून समजण्यात येतील.

२. यास्तव, स्थानिक स्वराज्य संस्थेंतर्गत शाळांमधील पदभरती यापूर्वी भरतीपूर्व केंद्रीय निवड परिक्षेच्या माध्यमातून करण्याबाबत पारित करण्यात आलेले शासन निर्णय दि.३०.०४.२००८, दि.१६.१२.२००९ या शासन निर्णयाद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहेत.

३. **शिक्षण सेवक भरती कार्यपध्दती:-** शिक्षण सेवक रिक्त पदावर भरती अभियोग्यता व बुध्दिमत्ता चाचणीतील गुणांच्या आधारावर करताना अनुसरावयाची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे राहील.

३.१ "सरल" ( Systematic Administrative Reforms for Achievement in Learning by Students ) या संगणकीय प्रणालीवरील नोंदणीकृत विद्यार्थी संख्येच्या आधारे, सर्व शाळांची संच मान्यता करण्यात येईल. रिक्त पदांची माहिती प्रसिध्द होण्यापूर्वी अतिरिक्त शिक्षकांचे समायोजन करण्यात येईल.

३.२ समायोजनेअंती राज्यातील शिक्षण सेवकांच्या रिक्त पदांची माहिती ही विषय, प्रवर्ग, माध्यम व बिंदूनामावलीनुसार "पवित्र" ( Pavitra - Portal For Visible To All Teacher Recruitment ) या संगणकीय प्रणालीद्वारे प्रसिध्द करण्यात येईल.

३.३ सर्व व्यवस्थापनांच्या शाळातील शिक्षण सेवकांच्या रिक्त पदांच्या भरतीकरिता व्यावसायिक व किमान शैक्षणिक अर्हतेसह विषयनिहाय, माध्यमनिहाय, प्रवर्गनिहाय व बिंदूनामावलीनुसार जाहिरात "पवित्र" या संगणकीय प्रणाली मध्ये प्रसिध्द करणे अनिवार्य असेल.

३.४ प्रत्येक जाहिरात या संकेतस्थळावर किमान १५ दिवसांच्या कालावधीसाठी उपलब्ध असेल. त्याचबरोबर सदर जाहिरात जास्त खपाच्या स्थानिक दोन वृत्तपत्रामध्ये (त्यापैकी किमान एक मराठी भाषेतील) संबंधित संस्था प्रसिध्द करतील तसेच, संबंधित सेवायोजन कार्यालय व जिल्हा समाज कल्याण कार्यालयासही अवगत करतील.

३.५ इच्छुक व अर्हता प्राप्त उमेदवार जाहिरातीच्या अनुषंगाने आपल्या अभियोग्यता चाचणी मधील पात्र गुणांसह ऑनलाईन अर्ज करतील.

३.६ जाहिरातीचा कालावधी संपल्यानंतर पाच कार्यालयीन दिवसांच्या आत संस्था गुणानुक्रमानुसार माध्यम, प्रवर्ग, विषय व बिंदूनामावलीनुसार उमेदवारांची निवडसूची जाहीर करेल व निवडसूचीतील उच्चतम गुणप्राप्त संबंधित उमेदवारांना e-mail द्वारे तसेच नोंदणीकृत डाकेने नियुक्ती पत्र पाठविण्यात येईल.

**३.७** नोंदणीकृत डाकेद्वारे किंवा **e-mail** यापैकी जे लवकर प्राप्त होईल त्या दिवसापासून १५ दिवसांच्या आत निवड झालेला उमेदवार संस्थेत रुजू अहवाल देईल. विहीत कालावधीत हजर न राहिलेल्या उमेदवाराने त्याचा हक्क सोडला असल्याचे समजण्यात येईल व नंतर त्याचा विचार केला जाणार नाही. सदर उमेदवारानंतर गुणवत्ता यादीत लगतच्या उमेदवारास वरीलप्रमाणे विहीत कालमर्यादेत रुजू होण्याकरिता संस्था कळवेल. सदर निवडसूची तीन महिन्याच्या कालावधीकरीता ग्राह्य धरण्यात येईल. तद्नंतर संबंधित संस्थेस पदभरती करीता नव्याने जाहिरात प्रसिध्द करणे आवश्यक राहील.

**३.८** संबंधित संस्थेद्वारे नियुक्तीपत्र पाठविल्यावर निवड झालेल्या उमेदवारांचे त्या तारखेपर्यंतचे सर्वोत्तम प्राप्त गुण बाद समजण्यात येतील. अर्थात प्राप्त गुणांचा उपयोग एकापेक्षा अधिक नियुक्तीसाठी करता येणार नाही. तथापि, खालील परिस्थितीमध्ये उमेदवारांना दुसरी नियुक्ती स्विकारण्याची परवानगी राहील.

**३.८.१** पहिली नियुक्ती स्वयंअर्थसहाय्यित किंवा शासकीय अनुदानाच्या अपेक्षेत असलेल्या संस्थेत झाली असल्यास आणि सद्याचा अर्ज अनुदानित संस्थेकरीता असल्यास,

**३.८.२** उमेदवाराने आपल्या पाच संधीची मर्यादा संपविली नसल्यास, त्यास पुन्हा चाचणी देऊन नवीन गुण मिळविता येतील व हे नवीन गुण प्रवर्गनिहाय वयोमर्यादेत वापरता येतील.

४. वयोमर्यादा, बिंदुनामावली, शैक्षणिक अर्हता व इतर अनुषंगिक सेवाशर्तीबाबतचे प्रचलित निकष कायम राहतील अथवा यामध्ये शासन वेळोवेळी सुधारणा करील, त्याप्रमाणे राहील.

५. **<u>परिक्षेचे आयोजन व स्वरुप</u>** :- शिक्षण सेवकाच्या निवडीसाठी अभियोग्यता व बुध्दिमत्ता चाचणी परीक्षेचे आयोजन शासन निश्चित करेल, अशा परीक्षा यंत्रणामार्फत आयोजित करण्यात येईल. सदर परीक्षा यंत्रणेकडून राज्यातील सर्व जिल्ह्यामधील परिक्षा केंद्रे निश्चित करण्यात येतील. या चाचणी <u>परिक्षेचे आयोजन व स्वरुप</u> खालीलप्रमाणे राहील:-

**५.१** अभियोग्यता व बुध्दिमत्ता चाचणी परीक्षा घेण्यात येईल. अर्थात विषयनिहाय चाचणी घेतली जाणार नाही.

सदर परीक्षा ऑनलाईन पध्दतीने घेण्यात येईल.

सदर परीक्षा वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरुपाची असेल.

**५.२** समान काठिण्य पातळीच्या किमान १० ऑनलाईन प्रश्नपत्रिका सदर परीक्षा यंत्रणा तयार ठेवेल. परीक्षार्थ्यांना समान काठिण्यपातळीचे विविध प्रश्नपत्रिका देण्यात येतील.

**५.३** परीक्षेत मिळालेले गुण उमेदवारांस परीक्षा संपल्यावर त्वरीत कळतील.

**५.४** एका उमेदवारास जास्तीत जास्त ५ वेळा गुण सुधारणेविषयी संधी उपलब्ध राहील. अर्थात, सदर उमेदवार जास्तीत जास्त ५ वेळा सदर चाचणी देऊ शकेल.

**५.५** परीक्षेत मिळालेले गुण भरती प्रक्रियेतील सर्व प्रकारच्या शाळांकरीता (प्राथमिक/उच्च प्राथमिक/माध्यमिक/उच्च माध्यमिक) समान समजण्यात येतील.

**५.६** उमेदवारास सदर परीक्षेत मिळालेले सर्वाधिक गुण, भरती प्रक्रियेंतर्गत प्रवर्गनिहाय कमाल वयोमर्यादेपर्यंत ग्राह्य धरण्यात येईल.

**५.७** अभियोग्यता चाचणी परीक्षेचे प्रथम आयोजन सदर शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून ६ महिन्याच्या आत सदर परीक्षा यंत्रणेकडून करण्यात येईल. तद्नंतर सदर परीक्षा यंत्रणेच्या तयारीनुसार मागणीवर आधारित अशी परीक्षा घेण्यात येईल. तथापि, दोन परीक्षेमधील अंतर ४ महिन्यापेक्षा जास्त असणार नाही.

**५.८** परीक्षेस बसणाऱ्या उमेदवारांची संख्या अधिक झाल्यास आणि एकाच वेळी सर्वांची ऑनलाईन चाचणी घेण्याची व्यवस्था करता येणे शक्य नसल्यास, काही फेऱ्यांमध्ये चाचणी परीक्षा घेण्यात येईल.

**५.९** परीक्षेचे संभाव्य वेळापत्रक परीक्षा यंत्रणेमार्फत जाहीर करण्यात येईल.

६. **परिक्षेचे माध्यम व अभ्यासक्रम :-** परीक्षेचे माध्यम मराठी, इंग्रजी व उर्दू असेल. उमेदवारांस यापैकी एक माध्यम निवडावे लागेल.

**अभ्यासक्रम:-** सदर परीक्षा एकूण २०० गुणांची राहील तसेच परीक्षेसाठी पुढीलप्रमाणे दोन घटक राहतील.

| **अ.क्र.** | **घटक** | **शेकडा प्रमाण** | **एकूण गुण** | **एकूण प्रश्न** |
|---|---|---|---|---|
| अ) | अभियोग्यता | ६०% | १२० | १२० |
| ब) | बुध्दिमत्ता | ४०% | ८० | ८० |
| | **एकूण :-** | १००% | २०० | २०० |

अ) अभियोग्यता या घटकांतर्गत गणितीय क्षमता, तार्किक क्षमता, वेग आणि अचूकता, भाषिक क्षमता (इंग्रजी), भाषिक क्षमता (मराठी), अवकाशीय क्षमता, कल/आवड, समायोजन/ व्यक्तिमत्व इत्यादी उपघटक सर्वसाधारणपणे राहतील.

ब) बुध्दिमत्ता या घटकांतर्गत आकलन, वर्गीकरण, समसंबंध, क्रम-श्रेणी, तर्क व अनुमान, कूट प्रश्न, सांकेतिक भाषा, लयबध्द मांडणी इत्यादी उपघटक सर्वसाधारणपणे राहतील.

सदर परीक्षा ही विषय ज्ञानावर होणार नाही. त्यामुळे या परीक्षेच्या अभ्यासक्रमासाठी विशिष्ट स्तर मर्यादा असणार नाही. तथापि राज्य शासन परीक्षेकरितेचा अभ्यासक्रम वेळोवेळी निर्धारित करेल.

७. **अभियोग्यता चाचणीकरीता उमेदवाराची अर्हता :-** इयत्ता १ ली ते ८ वी मधील शिक्षक पदाकरीता महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मध्ये विहित केलेली शैक्षणिक व व्यावसायिक अर्हता धारण केलेले तसेच, शिक्षक पात्रता परीक्षा ( TET ) उत्तीर्ण उमेदवार अभियोग्यता चाचणीकरीता पात्र असतील तसेच,

इयत्ता ९ वी ते १२ वी करीता उक्त नियमावलीत विहित केलेली शैक्षणिक व व्यावसायिक अर्हता धारण केलेले उमेदवार सदर परिक्षेकरीता पात्र राहतील.

८. **शिक्षण सेवकाच्या नियुक्तीचा कालावधी :-** दिनांक २७.०२.२००३ तसेच दिनांक १३.१०.२००० च्या शासन निर्णयामध्ये दर्शविल्याप्रमाणे सर्वसाधारणपणे तीन वर्ष राहील.

९. **रजेच्या कालावधीतील नियुक्ती :-** दिनांक २७.०२.२००३ च्या शासन निर्णयामध्ये दर्शविल्याप्रमाणे राहील.

१०. **नियुक्तीचे माध्यम :-** शिक्षण सेवक पदासाठी आवश्यक असलेल्या शैक्षणिक व व्यावसायिक अर्हतेनुसार उमेदवाराने ज्या माध्यमासाठी अर्ज केला असेल, त्या माध्यमासाठीच पदावर नियुक्ती देण्यात येईल.

११. **शिक्षण सेवकाची वयोमर्यादा :-** शिक्षण सेवक पदी किमान वयोमर्यादा १८ वर्ष व कमाल वयोमर्यादा खुल्या प्रवर्गातील उमेदवाराकरीता ३८ वर्ष व मागासवर्ग प्रवर्गातील उमेदवारांकरीता ४३ वर्ष राहील. सेवा प्रवेश वयोमर्यादेबाबत शासन, वेळोवेळी शासन निर्णयाद्वारे विहित करील, अशी वयोमर्यादा शिक्षण सेवकांना लागू होईल.

१२. **कागदपत्रांची पडताळणी :-** शिक्षण सेवक पदी निवड झालेल्या उमेदवाराने विहित मुदतीत संस्थेत रुजू अहवाल दिल्यानंतर त्याच्या शैक्षणिक व व्यावसायिक प्रमाणपत्राची पडताळणी खालील समितीमार्फत करण्यात येईल.

अ) स्थानिक स्वराज्य संस्थेतंर्गत जिल्हा परिषदेच्या शाळांसाठी खालीलप्रमाणे समिती राहील :-

**१.** मुख्य कार्यकारी अधिकारी - अध्यक्ष
**२.** समाज कल्याण अधिकारी - सदस्य
**३.** शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक) - सदस्य सचिव

ब) महानगर पालिकेच्या शाळांसाठी खालीलप्रमाणे समिती राहील:-

| | |
|---|---|
| १. आयुक्त, महानगरपालिका | - अध्यक्ष |
| २. समाज कल्याण अधिकारी | -सदस्य |
| ३. प्रशासन अधिकारी | -सदस्य सचिव |

क) खाजगी शैक्षणिक संस्थातंर्गत असलेल्या शाळांमध्ये निवड झालेल्या उमेदवारांच्या कागदपत्राची पडताळणी शाळा समितीमार्फत करण्यात येईल.

कागदपत्राच्या पडताळणीस उपस्थित असलेल्या उमेदवाराच्या उपस्थितीबाबत नोंद ठेवणे आवश्यक राहील. उमेदवारांची मुळ कागदपत्रे तपासल्याची नोंद घेवून उमेदवारांकडून प्रमाणपत्राच्या प्रतीचा एक संच घ्यावा व त्यावर कागदपत्रांच्या पडताळणीचा दिनांक व नोंद क्रमांक नोंदविण्यात यावा. मुळ प्रमाणपत्रे उमेदवारास तात्काळ परत करण्यात यावीत.

१३. **तक्रारीचे निराकरण** :- शिक्षण सेवक पद भरतीकरीता विहित केलेल्या कार्यपध्दतीअंती निवड यादीनुसार पात्र ठरलेल्या उमेदवारांना १५ दिवसात नियुक्तीच्या ठिकाणी हजर राहण्यास नोंदणीकृत डाकेने पत्राद्वारे अथवा e-mail द्वारे संबंधित संस्थेतर्फे कळविण्यात यावे. निवड होऊनही उमेदवारास नियुक्ती पत्र अथवा e-mail प्राप्त न झाल्यास, उमेदवाराच्या तक्रारीचे निराकरण करण्याची जबाबदारी त्या-त्या संस्थेची व संबंधित शिक्षणाधिकारी यांची राहील. निवड झालेल्या उमेदवाराने याबाबत लेखी तक्रार विहित कालावधीत संबंधित प्राधिकाऱ्यांकडे करावी. प्राप्त झालेल्या तक्रारीचे निवारण संबंधित प्राधिकाऱ्यांनी १५ दिवसांत करणे आवश्यक राहील. अभियोग्यता चाचणीस अनुसरुन न्यायालयीन प्रकरणे उपस्थित झाल्यास त्याचे परिक्षेत्र महाराष्ट्र राज्य राहील.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०६२७१७००३९२१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nand Kumar

Digitally signed by Nand Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, serialNumber=dcd3577ebf0e05e2a8b57095c152dc6cfb37c2bb83da197788645dd8a362ebc5, cn=Nand Kumar
Date: 2017.06.27 16:59:39 +05'30'

**( नंदकुमार )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
५) मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
६) मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
७) मा. विधान सभा/विधान परिषद सदस्य (सर्व), विधान भवन मुंबई
८) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
९) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय,मुंबई
१०) प्रधान सचिव (सर्व), मंत्रालय,मुंबई
११) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) आयुक्त, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, पुणे
१३) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) शिक्षण संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) संचालक,महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद,पुणे
१६) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ
१७) विभागीय आयुक्त (महसूल विभाग) (सर्व)
१८) सर्व जिल्हाधिकारी
१९) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
२०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२१) मुख्य अधिकारी, नगर पालिका/नगरपरिषद (सर्व)
२२) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
२३) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय,मुंबई
२४) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे
२५) निवड नस्ती (टिएनटी-१).